१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र पुरस्कृत अल्पसंख्यांक बहुक्षेत्र विकास योजनेंतर्गत (MsDP) वाशिम जिल्ह्यातील कारंजा, मानोरा व मालेगांव येथील मुलींच्या प्रत्येकी एका वसतीगृह बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील अनुदान वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१२/प्र.क्र.१३७ (१)/का.७,**

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ३१ मार्च, २०१५

संदर्भ: - १. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३ (२) /२००८-PP-I, दि.२५/२/२०१३.

२. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, समक्रमांकित दिनांक २८/३/२०१३ व दि.२९/०३/२०१३.

३. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, समक्रमांकित दिनांक १/०१/२०१५

४. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ३/१३(२)/२००८-PP-I, दि.३०/०१/२०१५.

**प्रस्तावना:-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाच्या बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) गठित शक्तीप्रदान समितीने दि.३०/१/२०१३ रोजीच्या ६४ व्या बैठकीत वाशिम जिल्ह्यात कारंजा, मानोरा व मालेगांव येथे मुलींसाठी प्रत्येकी एक याप्रमाणे एकूण तीन वसतीगृहांच्या बांधकामाकरीता एकूण रुपये ९३०.०० लाख (अक्षरी रुपये नऊ कोटी तीस लाख फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने संदर्भ क्रमांक (१) येथील पत्रान्वये केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील रुपये ४६५.०० लाख (अक्षरी रुपये चार कोटी पासष्ठ लाख फक्त) इतके अनुदान मंजूर करुन वितरीत केले आहे. यासंदर्भातील केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाच्या मान्यतेस अनुसरुन, संदर्भ क्रमांक (३) येथील शासन निर्णयांन्वये वाशिम जिल्ह्यातील कारंजा, मानोरा व मालेगांव येथील मुलींसाठी प्रत्येकी एक याप्रमाणे एकूण तीन वसतीगृह बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे, संदर्भ क्रमांक (२) येथील शासन निर्णयांन्वये वाशिम जिल्ह्यातील मुलींच्या ०३ वसतीगृह बांधकामाकरीता रुपये २,२०,४५,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी वीस लाख पंचेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, वाशिम यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली होती. आता केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक

कार्य मंत्रालयाने संदर्भ क्रमांक (४) येथील पत्रान्वये ०३ वसतीगृह बांधकामाकरीता केंद्रहिश्श्यातील उर्वरीत रुपये २,४४,५५,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी चव्वेचाळीस लाख पंचावन्न हजार फक्त) इतकी रक्कम सन २०१४-१५ या वर्षात वापरण्यास अनुमती दिली आहे. त्यानुषंगाने सदर रक्कम जिल्हाधिकारी, वाशिम यांना वाशिम जिल्ह्यातील मुलींच्या ०३ वसतीगृह बांधकामाकरीता वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमी तसेच १२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) संदर्भ क्रमांक (४) येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, वाशिम जिल्ह्यातील कारंजा, मानोरा व मालेगांव येथे मुलींसाठी बांधण्यात येत असलेल्या प्रत्येकी एक याप्रमाणे एकूण ०३ वसतीगृहांच्या बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील रुपये २,४४,५५,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी चव्वेचाळीस लाख पंचावन्न हजार फक्त) इतकी रक्कम वाशीम जिल्हयासाठी पुढील विवरणपत्रातील स्तंभ क्र.१० प्रमाणे जिल्हाधिकारी, वाशिम यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

(रुपये लाखात)

| अ क्र. | वसतीगृह बांधकामाचे ठिकाण | कामाचे स्वरुप | केंद्र-राज्य हिश्श्याचे प्रमाण | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण (प्रती युनिट किंमत) | केंद्रातर्फे पहिल्या टप्प्यात वितरीत ५०% तरतूद (केंद्र हिस्सा) | रकाना क्रमांक ८ नुसार केंद्रातर्फे पहिल्या टप्प्यात वितरीत ५० % तरतुदीचे वितरण | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | शासन निर्णय दि.२८/३/१३ व दि.२९/३/१३ अन्वये वितरीत केलेली रक्कम | सन २०१४-१५ या वर्षात वितरीत करावयाची रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | कारंजा | मुलींचे १ वसतीगृह | १००:०० | ३१०.०० | ०० | ३१०.०० | १५५.०० | २२०.४५ | २४४.५५ |
| २ | मानोरा | मुलींचे १ वसतीगृह | १००:०० | ३१०.०० | ०० | ३१०.०० | १५५.०० | | |
| ३ | मालेगांव | मुलींचे १ वसतीगृह | १००:०० | ३१०.०० | ०० | ३१०.०० | १५५.०० | | |
| | | | **एकूण** | **९३०.००** | **००** | **९३०.००** | **४६५.००** | **४६५.००** | |

२. बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) सन २०१४-१५ या वर्षाकरीता मुलींचे वसतीगृह बांधकाम योजनेकरीता वाशिम जिल्ह्यासाठी केंद्राचा हिस्सा म्हणून उपरोक्त तक्त्यामधील स्तंभ क्र.

१० मध्ये नमूद केलेली रु.२४४.५५ लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी चव्वेचाळीस लाख पंचावन्न हजार फक्त ) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, वाशिम यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. जिल्हाधिकारी, वाशिम यांना सन २०१४-१५ करीता उपरोक्तप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी,वाशिम यांनी आहरीत केलेली रक्कम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा वाशिम यांच्याकडे रितसर सूपूर्द करावी. सदर रकमेचा विनियोग आणि वितरण करण्याबाबत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने वेळोवेळी विहीत केलेल्या सर्व अटी व शर्तींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, वाशिम यांच्यावर राहील.

४. संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये वाशीम जिल्हयास मुलींची ०३ वसतीगृहे बांधकामासाठी वितरीत करण्यात आलेल्या रु.२२०.४५ लाख इतक्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधिताकडून प्राप्त करुन घ्यावे तदनंतरच निधी वितरीत करण्यात यावा तसेच, निधी मागणीचा प्रस्ताव सादर करताना पूर्वी वितरीत करण्यात आलेल्या संपूर्ण निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्रस्तावासोबत सादर करण्यात यावे

५. केंद्रशासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१६/०२/२०१५ रोजीच्या पत्रातील सूचनानुसार बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) वितरीत करण्यात येणा-या निधीस VAT वा कोणत्याही प्रकारचे विभागीय कर लागू राहणार नाहीत.

६. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता जिल्हाधिकारी, वाशिम यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, वाशिम यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

७. जिल्हाधिकारी, वाशिम यांनी विकासकामांच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या / होणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच त्याबाबतचा त्रैमासिक

प्रगती अहवाल (QPR) विहीत नमुन्यात शासनास वेळोवेळी सादर करावा. त्याचप्रमाणे, विकासकामांची सद्यस्थिती दर्शविणारी छायाचित्रे (Photos) केंद्र व राज्यशासनाच्या संकेतस्थळावर त्रैमासिकरित्या अपलोड करण्याबाबत कार्यवाही करावी.

८. सदर योजनेंतर्गत **केंद्र हिश्श्यावर** होणारा खर्च **मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी क्षेत्रविकास योजना (केंद्र हिस्सा) (२२३५ ए ५४३) ३१ - सहाय्यक अनुदान** या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५३/का. १४७५, दि.१८,मार्च २०१५ अन्वये त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २७७/व्यय-४, दि.३०,मार्च २०१५ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०३३११३५६३६६८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GANGURDE SANJAY SURYAKANT
Date: 2015.03.31 14:07:24 +05'30'

( सं.सु.गांगुर्डे )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.

२. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.

३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई

४. जिल्हाधिकारी, वाशिम

५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.

६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड

७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वाशिम

८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला, मुंबई

९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा वाशिम.

१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.

११.नियोजन विभाग (कार्या.१४७५)

१२.निवड नस्ती, का.७